**महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळ (मर्यादित) पुणे यांच्या संचालक मंडळावर सैन्यदलातील सेवानिवृत्त अधिका-यांना <u>संचालक पदावर नेमणूक करणेबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्र.मासैमं -२००९/२०७/प्र.क्र.७५/का.२८
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १० मार्च,२०१०

**<u>वाचा:-</u>**(१)शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:मासैक-२००५/६२३/प्र.क्र.११८/ २००५/२८,दिनांक २३ जून,२००८.
(२)शासन पत्र, सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक:मासैमं २००६/२०११/प्र.क्र.३१२/०६/ २८, दिनांक ७/११/२००८.
(३)महाव्यवस्थापक, महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळ, मर्या.,पुणे यांचे पत्र क्र. MESCO/Govt/Gen/Corres, दिनांक ५/२/२००९ व २४/२/२००९.

**<u>शासन निर्णय</u> :-**

महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळाची स्थापना दि.१८.१.२००२ च्या शासन निर्णयानुसार करण्यात आलेली आहे. महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळाच्या मेमोरॅन्डम ऑफ असोसिएशन आणि आर्टिकल्स ऑफ असोसिएशन मधील कलम ७१ नुसार महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळावर किमान ३ व कमाल १२ संचालक नियुक्त करता येतात.तसेच आर्टिकल्स ऑफ असोसिएशन मधील कलम ७२ व ७३ नुसार हया महामंडळाच्या संचालक मंडळावर अध्यक्ष व संचालक नियुक्तीचे अधिकार मा.राज्यपाल यांना आहेत.

२. महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळाच्या संचालक मंडळाच्या रचनेनुसार "संरक्षक दलातील कमिशण्ड ऑफिसर दर्जाच्या खाली नसलेले व निवृत्तीवेतनधारक असलेले तीन माजी सैनिक अधिकारी" मेस्कोच्या संचालक मंडळावर नियुक्त होणे आवश्यक आहे. तथापि,मेस्कोच्या संचालक मंडळावर संदर्भाधीन अ.क्र. (१) येथील दि.२३/६/२००८च्या शासन निर्णयान्वये संरक्षण दलातून निवृ-त झालेल्या ३ अधिका-यांपैकी (१)सुभेदार श्री.बाळासाहेब देवपुजारी,नागपूर व (२)श्री.दामोदर धोडींबा गुंठे, लातूर हे कमीशण्ड ऑफिसर नसल्याने त्यांची संचालक पदावरील नियुक्ती रद्द करण्यात येत आहे. त्यांच्या जागी सैन्य दलात कमीशन्ड ऑफिसर असलेले व संरक्षक दलातून निवृत झालेल्या खालील २ अधिका-यांची महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळाच्या संचालक मंडळावर संचालक म्हणून शासन नियुक्ती करीत आहे:

(१) कर्नल (निवृत्त)भगतसिंह देशमुख, बि.१६/२,साळुंखे विहार,पुणे-४११०२२.

(२)ब्रिगेडीयर (निवृत्त) ए.एन. शिरपूरकर, व्ही.एस. एम., बि.७/२,साळुखे विहार,पुणे-४११०२२.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१००३१०१२१९५८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सही/-

**( अ. द. जोशी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

मा. राज्यपाल यांचे सचिव,
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा. मंत्री (माजी सैनिक कल्याण) यांचे खाजगी सचिव,
मा. राज्यमंत्री (माजी सैनिक कल्याण विभाग) यांचे खाजगी सचिव,
प्रधान सचिव,सामान्य प्रशासन विभाग (माजी सैनिक कल्याण ) यांचे स्वीय सहायक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
महालेखापाल,(लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) -१, महाराष्ट्र , मुंबई,
महालेखापाल,(लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
महाव्यवस्थापक, महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळ, रायगड, राष्ट्रीय युध्द स्मारकासमोर, सोलापूर रस्ता, घोरपडी, पुणे - ४११ ००१.
संचालक, सैनिक कल्याण विभाग, महाराष्ट्र राज्य यांचे कार्यालय,रायगड, राष्ट्रीय युध्द स्मारकासमोर ,सोलापूर रस्ता,घोरपडी,पुणे - ४११ ००१.
* लेफ्टनंट जनरल श्री.डी.बी.शेकटकर, ११२/१, कोरेगांव पार्क, पुणे-४११ ००१.
* कर्नल (निवृत)भगतसिंह देशमुख, बि.१६/२,साळुंखे विहार,पुणे-४११०२२.
* ब्रिगेडीयर (निवृत) ए.एन. शिरपूरकर, व्ही.एस. एम., बि.७/२,साळुखे विहार,पुणे-४११०२२.
* सुभेदार श्री. बाळासाहेब देवपुजारी, जे.पी.चेंबर नं.१, २ रा मजला,साऊथ आंबाझरी रोड, माधवनगर, नागपूर
* श्री. दामोदर धोंडिबा गुंठे, अंबाजोगाई रोड, लातूर,

निवड नस्ती (२ प्रती),

* पत्राने